**महाराष्ट्र शासन**

क्रमांक : आस्था-२०१६/प्र.क्र.१२५/आस्थापना
पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई -४०० ०३२.
दिनांक : २९ ऑगस्ट, २०१८

**वाचा** : १) शासन परिपत्रक महिला व बालविकास विभाग क्रमांक मकक-२०१०/ प्र.क्र. ४६/ मकक दि. ११.०६.२०१०

२) शासन निर्णय महिला व बालविकास विभाग क्रमांक : मकचौ-२०१३/ प्र.क्र. ६३/ मकक दि. १९.०६.२०१४

३) महिला व बाल विकास विभाग पत्र क्र. संकीर्ण २०१४/ प्र.क्र. ४३/ मकक दि. २१.०३.२०१६ दि. २४.०५.२०१६

४) कार्यालयीन आदेश क्र आस्था-२०१६/प्र.क्र.१२५/आस्थापना, दि.१३.१२.२०१६

## कार्यालयीन आदेश

कामाच्या ठिकाणी महिलांच्या होणाऱ्या लैंगिक सतावणुकीस प्रतिबंध करण्यासाठी मा. सर्वोच्च न्यायालयात रिट विनंती अर्ज (सीआर एल) क्रमांक ६६६-६७०/१९९२ दाखल झाला होता. त्यामध्ये मा. सर्वोच्च न्यायालयाने दिलेल्या निर्णयानुसार केंद्र शासनाने कामाच्या ठिकाणी महिलांचे लैंगिक छळापासून संरक्षण (प्रतिबंध, मनाई आणि निवारण) अधिनियम २०१३ व नियम दि. ९ डिसेंबर, २०१३ रोजी प्रसिद्ध केला आहे. अधिनियमातील तरतुदीनुसार लैंगिक छळाबाबत येणाऱ्या तक्रारींची चौकशी करणे व त्यानुसार कारवाईची शिफारस करणे याकरिता समिती स्थापन करण्याच्या सूचना महिला व बाल विकास विभागाने संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णयान्वये दिल्या आहेत. या विभागासाठी संदर्भ क्र.४ येथील दि.१३.१२.२०१६ च्या आदेशान्वये महिला तक्रार निवारण समिती स्थापन करण्यात आली होती. सदर समिती मधील अध्यक्ष/सदस्यांच्या बदली/सेवानिवृत्तीमुळे सदर समिती पुनर्गठीत करणे आवश्यक आहे. त्यानुसार संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयानुसार या विभागासाठी खालील प्रमाणे “अंतर्गत तक्रार समिती” पुनर्गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| १. | श्रीमती प्रगती नारिंग्रेकर,अवर सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | अध्यक्ष |
| २. | श्री.मं.हि.बनसोडे,कक्ष अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| ३. | श्रीमती शिल्पा कवळे,कक्ष अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य सचिव |
| ४. | टाटा इन्सिटयुट ऑफ सोशल सायन्स ,देवनार,मुंबई यांचे प्रतिनिधी | अशासकीय सदस्य |

२. वरील समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल.

अ) विभागातील महिला अधिकारी/कर्मचारी यांच्या लैंगिक सतावणुकीच्या तक्रारींची दखल घेणे.

ब) तक्रारीत तथ्य आढळून आल्यास त्याबाबत चौकशी करुन संबंधितांविरुध्द शिस्तभंगाची कार्यवाही करण्याकरीता प्रधान सचिवांकडे वेळोवेळी शिफारस करणे.

क) केलेल्या कामाचा वार्षिक अहवाल प्रधान सचिवांना सादर करावा.

३. अशासकीय सदस्याला अंतर्गत समितीच्या प्रत्येक कामाच्या दिवसासाठी दि. १९.०६.२०१४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार भत्ता/प्रवास खर्च मंजूर करण्यात येईल.

४. सदर कार्यालयीन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०८२९११२८०३१५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Anees Iqbal Ismail Shaikh
Date: 2018.08.31 12:51:05 +05'30'

**( अनिस शेख )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
२. सचिव, महिला बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
३. सह सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
४. सर्व उप सचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
त्यांना विनंती आहे की, सदर कार्यालयीन आदेश त्यांच्या अधिपत्याखालील महिला कर्मचाऱ्यांच्या निदर्शनास आणावे.
५. संचालक, टाटा इन्स्टिटयूट ऑफ सोशल सायन्स,देवनार, मुंबई - ८८
६. श्रीमती प्रगती नारिंग्रेकर, अवर सचिव, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
७. श्रीमती शिल्पा कवळे, कार्यासन अधिकारी,(सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई -३२
८. श्री. मं.हिं.बनसोडे, कार्यासन अधिकारी, (सां.का.३),पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
९. उप सचिव (मकक), महिला व बाल विकास विभाग, नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ३२
१०. स्वीय सहाय्यक, प्रधान सचिव, (प.व सां.का.) व अन्य महिला कर्मचारी, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
११. निवडनस्ती